**अनुसूचित जाती उपयोजना अंतर्गत अनुसूचित जाती / नवबौध्द शेतक-यांना शेतीसाठी अर्थसहाय्य देण्याची योजना सन २०११-१२ मध्ये राबविण्यासाठी वित्तीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- विघयो १६११/ प्र.क्र.११२/४अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक - २३ ऑगस्ट, २०११**

**संदर्भ :- १) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग ,क्र. विघयो- १६१०/ प्र.क्र. १६८ /४-अे, दि. २६ जुलै,२०१० व ०९ फेब्रुवारी, २०११**
**२) शासन निर्णय क्रमांक :- विघयो १६११/ प्र.क्र.११२/४अे, दि. ३ जून, २०११**
**३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. विप्र-७/विघयो/मा. निधी.वि/११-१२/९४७/११, दि. - १६ जुलै,२०११**

**प्रस्तावना :-**

दारिद्रय रेषेखाली असणा-या अनुसूचित जाती /नवबौध्द शेतक-यांचे उत्पन्न वाढवून त्यांना दारिद्रय रेषेवर आणण्यासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना कृषि विभागामार्फत विशेष घटक योजनेतर्गत सन १९८२ पासून राज्यामध्ये राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत जमीन सुधारणा, निविष्ठा पुरवठा, पीक संरक्षण औजारे /शेतीची सुधारीत औजारे, बैलगाडी, बैलजोडी/ रेडेजोडी, इनवेल बोअरिंग, जुनी विहीर दुरुस्ती, पाईपलाईन, पंपसेट, ताडपत्री, नवीन विहीर इत्यादी बाबींवर अनुसूचित जाती /नवबौध्द शेतक-यांना अनुदान देण्यात येते. सदर योजना सन २०११-१२ मध्ये चालू ठेवण्यासाठी रू. ९५५३.३३ लाख (रु. पंच्याण्णव कोटी त्रेपन्न लाख तेत्तीस हजार फक्त) कार्यक्रमास शासनाची प्रशासकीय व रू. ५००.०० ( रू. पाच कोटी फक्त ) खर्चास वित्तीय मान्यता, संदर्भाधीन दि. ३ जून, २०११ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आली आहे. सदर योजना राज्यात राबविण्यासाठी वित्त विभागाने मान्यता दिलेल्या रू. ६६६४.९९ लाख ( रू. सहासष्ट कोटी चौसष्ट लाख नव्याण्णव हजार फक्त ) कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**अनुसूचित जाती/नवबौध्द शेतक-यांचे शेतातील पिकांचे उत्पादन वाढवून त्यांच्या उत्पन्नात वाढ करण्यासाठी अनुसूचित जाती /नवबौध्द शेतक-यांना शेतीसाठी अर्थसहाय्य देण्याची योजना सन २०११-१२ मध्ये राबविण्यास रू. ६६६४.९९ लाख ( रू. सहासष्ट कोटी चौसष्ट लाख नव्वाण्णव हजार फक्त ) खर्चाच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.** या योजनेअंतर्गत जमीन सुधारणा, निविष्ठा पुरवठा, पीक संरक्षण औजारे / शेतीची सुधारीत औजारे, बैलगाडी, बैलजोडी / रेडेजोडी, इनवेल बोअरिंग, जुनी विहीर दुरुस्ती, पाईपलाईन व पंपसेट, ताडपत्री, नवीन विहीर इत्यादी कार्यक्रम दि. ३ जून, २०११ च्या शासन निर्णयासोबत निर्गमित केलेल्या परिशिष्ट (एक) मधील कार्यक्रम

परिशिष्ट (दोन) मध्ये दिलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार व परिशिष्ट (तीन) मधील कार्यपध्दतीनुसार राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. जे लाभार्थी नवीन विहीर या घटकाचा लाभ घेणार आहेत, त्यांचे साठी प्रती लाभार्थी अनुदानाची कमाल मर्यादा रु.७००००/- ते १,००,०००/- राहील व जे लाभार्थी नवीन विहीर या घटकांचा लाभ घेणार नाहीत त्यांचेसाठी अनुदानाची कमाल मर्यादा रु.५०,०००/- (रुपये पन्नास हजार फक्त) राहील. नवीन विहिर या घटकासाठी अनुदानाची कमाल मर्यादा रु.१,००,०००/- लाख असली तरी विहीर खोदाईसाठी खर्च कमी झाल्यास खर्चाच्या मर्यादेइतकेच अनुदान देय राहील.

३. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी सविस्तर मार्गदर्शक सूचना कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमीत करतेवेळी त्यात दि. ३ जून, २०११ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ३ मधील मुद्दा I) ते VI) मध्ये नमूद केलेल्या बाबी अंतर्भूत करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. उपरोक्त योजना, सन २०११-१२ या वर्षामध्ये राबविण्यास एकूण रू. ६६६४.९९ लाख ( रू.सहासष्ट कोटी चौसष्ट लाख नव्वाण्णव हजार फक्त ) खर्चाच्या कार्यक्रमासाठी कृषि संचालक, (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व या निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेचा खर्च मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादित होईल याची दक्षता कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी.

५. या योजनेवरील खर्च सन २०११-१२ करीता खालील लेखाशिर्षांतर्गत मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष:-**

**मागणी क्रमांक डी-३**
**२४०१ पीक संवर्धन**
**८०० इतर खर्च,**
**८०० (दोन) पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना**
**राज्य योजनेअंतर्गत योजना**
**विशेष घटक योजना,**
**(००)(०३) दारिद्र्य रेषेच्या वर आणणेसाठी अनुसुचित जाती**
**उपयोजनेतंर्गत शेतक-यांना अर्थसहाय्य,(२४०१ १११४)**
**३३ - अर्थसहाय्य**

६. मंजूर निधीचे जिल्हा परिषदांना वाटप करण्यास कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

७.	हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ १४२/११ / व्यय- १, दि. २९ जुलै, २०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०९०८१३०२०५००१**असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

**( वि. मा. बिवलकर )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन,**

**प्रति**

आयुक्त कृषि,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व विभागीय आयुक्त
संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय,पुणे (१० प्रतीसह)
संचालक,समाज कल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व संचालक/सहसंचालक,कृषि आयुक्तालय,पुणे
सर्व विभागीय कृषि सह संचालक
जिल्हाधिकारी व सदस्य सचिव,जिल्हा नियोजन समिती (सर्व)
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
सर्व अति मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
व्यवस्थापकिय संचालक,महाबीज अकोला
सर्व कृषि विकास अधिकारी,जिल्हा परिषद
विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी,सर्व जिल्हे
जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
अधिदान व लेखा अधिकारी मुंबई
सामाजिक न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२, (कार्यासन विघयो १ )
सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी,(कृषि) कृषि व पदुम विभाग
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
सहसंचालक (विघयो) कार्यालय संचालक,समाज कल्याण,संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे - १
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग व्यय-१ / अर्थसंकल्प - १३ ,मंत्रालय,मुंबई
नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,
निवड नस्ती